**शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील अध्यापकांना ७ वा वेतन आयोग लागू केल्यानंतर सुधारित दराने व्यवसायरोध भत्ता व इतर भत्ते लागू करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वेतन-२०२१/प्र.क्र. ६२/२०२१/वैसेवा-२**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
तारीख :- १२ एप्रिल , २०२२.

**वाचा :-**

१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र. मंमनि-२००८/प्र.क्र. ४४/२००८/वैसेवा-२, दिनांक २७.०३.२००८
२) वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग शासन निर्णय क्र. एनपीए-२०१०/प्र.क्र. ११४/ १०/ वैसेवा-२, दिनांक २४.०७.२०१२
३) वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग क्र. वेतन-२०१९/प्र.क्र. ०३/२०१९/वैसेवा-२, दिनांक १३.०९.२०१९
४) केंद्र शासन वित्त मंत्रालय ज्ञापन क्र. एफ १२-२/२०१६/ई III-A, दिनांक ०७.०७.२०१७
५) केंद्र शासन आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय ज्ञापन क्र. V-१६०२०/२८/२०१७-INI-१, दिनांक २३.०८.२०१८
६) उच्च व तंत्र शिक्षण शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१८/प्र.क्र. ५६/१८/विद्यापीठ-१, दिनांक ०८.०३.२०१९

**प्रस्तावना :-**

राज्यातील शासकीय वैद्यकीय / दंत / आयुर्वेद महाविद्यालयामधील अध्यापक तसेच अधिष्ठाता, सह संचालक व संचालक यांना केंद्रीय वित्त मंत्रालयाच्या दि.३०.०८.२००८ रोजीच्या कार्यालयीन आदेशान्वये दिलेल्या सुचनांनुसार शासन निर्णय दि.२४.०७.२०१२ अन्वये ६ व्या वेतन आयोगाच्या धर्तीवर ३५% दराने तसेच नांदेड, धुळे, यवतमाळ व अंबाजोगाई आणि अलिबाग, नंदुरबार आणि सातारा येथे सुरु करण्यात आलेल्या नवीन वैद्यकीय महाविद्यालयातील अध्यापकांना ५०% दराने व्यवसायरोध भत्ता हा वेतन बँडमधील वेतन+ग्रेड पे + व्यवसायरोध भत्ता या सर्वांची एकत्रित रक्कम रु.८५,०००/- या कमाल मर्यादेत मंजूर करण्यात आला आहे. तसेच शासन निर्णय दि.२७.०३.२००८ अन्वये वैद्यकीय अभ्यास भत्ता रु.१०,०००/- वार्षिक, पदव्युत्तर भत्ता रु.२,५००/- दरमहा आणि तासिका भत्ता अध्यापकांना विहित केलेल्या तासिकेपेक्षा अधिक तासिका शिकविल्यास प्रत्येक जादा तासिकेला रु.५००/- मात्र, दरमहा रु.५,०००/- इतक्या कमाल मर्यादेत मंजूर करण्यात आला आहे.

शासकीय वैद्यकीय / दंत / आयुर्वेद महाविद्यालयामधील अध्यापकाना शासन निर्णय दि.१०.११.२००९ अन्वये ६ वा वेतन आयोग लागू करतांना एम.डी./एम.एस./पी.एच.डी. ही उच्चतम शैक्षणिक अर्हता धारण केल्यास ३ अचक्रिय वेतनवाढी व डी.एम./एम.सी.एच./डी.एन.बी. ही अतिविशेषीकृत अर्हता धारण केल्यास ५ अचक्रिय वेतनवाढी मंजूर करण्यात आल्या असून सहायक प्राध्यापक व सहयोगी प्राध्यापक यांना करीअर एडव्हान्समेंट स्कीम देखिल लागू करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे अधिष्ठाता, सह संचालक व संचालक या पदांना रु.३,०००/- प्रतिमाह इतका विशेष भत्ता लागू करण्यात आला आहे.

केंद्रीय वित्त मंत्रालयाने दि.०७.०७.२०१७ च्या आदेशान्वये ७ व्या वेतन आयोगाच्या धर्तीवर केंद्रीय आरोग्य सेवेत कार्यरत वैद्यकीय अधिकाऱ्यांना ७ व्या वेतन आयोगाच्या सुधारित वेतनश्रेणीवर २०% दराने व्यवसायरोध भत्ता रु.२,३७,५००/- इतक्या कमाल मर्यादेत (मूळ वेतन+व्यवसायरोध भत्ता) मंजूर केला आहे. सदरहू भत्ता केवळ चिकित्सालयीन (Clinical) पदांना व खाजगी व्यवसाय करण्याची मुबलक संधी असलेल्या तसेच खाजगी व्यवसायास प्रतिबंध असलेल्या वैद्यकीय अधिकाऱ्यांना मंजूर करण्यात आला आहे. तसेच भारतीय आर्युविज्ञान संस्थान (AIIMS) येथील अध्यापकांना केंद्रीय आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाने दि.२३.०८.२०१८ च्या परिपत्रकान्वये वैद्यकीय अभ्यास भत्ता रु.२२,५००/- प्रतिमाह (वार्षिक रु.२,७०,०००/-) व पदव्युत्तर भत्ता रु.१,५०,०००/- प्रतिवर्षी लागू करण्यात आला आहे.

विद्यापीठ अनुदान आयोगाच्या दि.०२.११.२०१७ व दि.०८.११.२०१७ तसेच दिनांक २८.१.२०१९ च्या पत्रान्वये केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने राज्यातील शासकीय वैद्यकीय / दंत / आयुर्वेद महाविद्यालयामधील पूर्णवेळ सहाय्यक प्राध्यापक / सहयोगी प्राध्यापक / प्राध्यापक / अधिष्ठाता तसेच शासकीय भौतिकोपचार / व्यवसायोपचार विद्यालय नागपूर मधील पूर्णवेळ अध्यापक त्याचप्रमाणे वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयातील सह संचालक व संचालक तसेच आयुष संचालनालयातील संचालक या संवर्गास दिनांक ०९.०९.२०१९ च्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये मान्यता प्राप्त झाल्यानुसार शासन निर्णय दि.१३.०९.२०१९ अन्वये ७ व्या वेतन आयोगाच्या केवळ वेतनश्रेणीच्या तरतूदी लागू करण्यात आल्या आहेत. तद्नंतर केंद्रिय वित्त मंत्रालय तसेच केंद्रिय आरोग्य व कुटुंब कल्याण, मंत्रालय आणि राजस्थान तसेच अन्य राज्य सरकारांनी त्यांच्या अधिनस्त शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील अध्यापक व अन्य पदांना लागू केलेल्या विविध भत्त्यांच्या धर्तीवर राज्यातील शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील अध्यापक तसेच अधिष्ठाता, सह संचालक व संचालक यांना सुधारित वेतनश्रेणीत व्यवसायरोध भत्ता व इतर भत्ते अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यासअनुसरुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

राज्यातील शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील अध्यापक तसेच अधिष्ठाता, सह संचालक व संचालक यांना खालीलप्रमाणे सुधारित दराने भत्ते लागू राहतील.

### २.१ व्यवसायरोध भत्ता -

राज्यातील शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील सहायक प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक, प्राध्यापक, अधिष्ठाता तसेच वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय आणि आयुर्वेद संचालनालयातील वैद्यकीय अर्हताधारक सह संचालक व संचालक यांना खालीलप्रमाणे सुधारित दराने व्यवसायरोध भत्ता देय राहील.

| | | | |
|---|---|---|---|
| अ) | शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील अचिकित्सालयीन व चिकित्सालयीन विषयातील अध्यापक / शासकीय दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील अध्यापक | **मूळ वेतनाच्या २०%** | (मूळ वेतन+ व्ययसायरोध भत्ता) सह कमाल मर्यादा रु. २,१८,६००/- |
| आ) | शासकीय वैद्यकीय महाविद्यालयातील अतिविशेषीकृत विषयातील अध्यापक | **मूळ वेतनाच्या ३०%** | (मूळ वेतन+ व्ययसायरोध भत्ता) सह कमाल मर्यादा रु. २,३७,५००/- |

*अध्यापकांना व्यवसायरोध भत्ता हा खाजगी वैद्यकीय व्यवसाय करत नसल्यास देण्यांत येतो. मात्र सेवानिवृत्तीनंतर त्यास खाजगी वैद्यक व्यवसाय करण्यात कोणताही अडथळा नसल्याने निवृत्ती वेतनाची परिगणना करतांना NPA ची रक्कम ग्राह्य धरण्यांत येवू नये.*

### २.२ पदव्युत्तर भत्ता :-

राज्यातील शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील अध्यापकीय संवर्गातील सहायक प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक व प्राध्यापक तसेच त्या महाविद्यालयातील अधिष्ठाता त्याचप्रमाणे वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय व आयुष संचालनालयातील सह संचालक व संचालक यांना प्रतिमाह रु.६,५००/- (वार्षिक रु.७८,०००/-) इतका पदव्युत्तर भत्ता देय राहील. तथापि, यापैकी जे अध्यापक/अधिष्ठाता/सह संचालक/संचालक हे संबंधित विषयातील पदव्युत्तर पदवी विद्यार्थ्यांना प्रत्यक्ष मार्गदर्शन (PG Guide) करीत असतील केवळ अशा व्यक्तींनाच सुधारित दराने पदव्युत्तर भत्ता अनुज्ञेय असेल.

### २.३ विशेष भत्ता :-

शासकीय वैद्यकीय /दंत / आयुर्वेद महाविद्यालयाचे अधिष्ठाता तसेच वैद्यकीय शिक्षण व संचालनालय व आयुष संचालनालयातील संचालक व सह संचालक यांना खालीलप्रमाणे सुधारित दराने विशेष भत्ता देय राहील.

| अ.क्र. | पदनाम | सुधारित दर (प्रतिमाह) |
|---|---|---|
| १ | संचालक | रु .९,०००-/ |
| २ | सह संचालक | रु .६,७५०-/ |
| ३ | अधिष्ठाता | रु .४,५००-/ |

**२.४ अतिरिक्त वेतनवाढ :-**

शासकीय वैद्यकीय व दंत महाविद्यालयातील चिकित्सालयीन (Clinical) व अतिविशेषीकृत (Super Specility) विषयातील सहायक प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक व प्राध्यापक यांना खालीलप्रमाणे अतिरिक्त वेतनवाढ देय राहतील.

**अ)** शासकीय वैद्यकीय / दंत महाविद्यालयातील चिकित्सालयीन (Clinical) विषयातील सरळसेवेने नियुक्ती होणाऱ्या सर्व अध्यापकांना सेवेत प्रथम प्रवेशाच्यावेळी ३ अतिरिक्त वेतनवाढी देण्यात याव्यात.

**आ)** शासकीय वैद्यकीय / दंत महाविद्यालयातील अतिविशेषीकृत (Super Specility) विषयातील सरळसेवेने नियुक्ती होणाऱ्या सर्व अध्यापकांना सेवेत प्रथम प्रवेशाच्यावेळी ५ अतिरिक्त वेतनवाढी देण्यात याव्यात.

***(वरीलप्रमाणे अतिरिक्त वेतनवाढी देय करताना यापूर्वी शासन सेवेत कोणत्याही पदावर अतिरिक्त वेतनवाढीचा लाभ घेतला असल्यास नव्याने अतिरिक्त वेतनवाढी देय ठरणार नाही.)***

**इ)** शासकीय वैद्यकीय / दंत महाविद्यालयातील अचिकित्सालयीन (Non-Clinical) विषयातील नियुक्ती होणाऱ्या सर्व अध्यापकांना तसेच शासकीय आयुर्वेद महाविद्यालयातील नियुक्ती होणाऱ्या सर्व अध्यापकांना या आदेशान्वये अतिरिक्त वेतनवाढीचा लाभ देय ठरणार नाही.

**२.५ करिअर ॲडव्हान्समेंट स्किम :-**

शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील अध्यापक व अन्य पदांना वेतनाव्यवतिरिक्त अन्य लाभ देणेबाबत सर्वसमावेशक धोरण व निकष निश्चित करण्यासाठी भारतीय प्रशासकीय सेवेतील अपर मुख्य सचिव दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली स्वतंत्र आयोग नेमण्याची बाब विचाराधीन असून विद्यापीठ अनुदान आयोग, भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग, भारतीय दंत परिषद तसेच आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित केलेले निकष व महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून अध्यापकीय पदांबाबत मानके (Norms) निश्चित करण्यात येतील. दरम्यानच्या कालावधीत सद्यस्थितीतील कार्यप्रणालीनुसार सहायक प्राध्यापक व सहयोगी

प्राध्यापक या संवर्गातील अध्यापकांना करिअर एडव्हान्समेंट स्किम लागू करतांना आवश्यक असलेल्या निकषांचा तपशिल सोबतच्या **परिशिष्ठ-१** मध्ये देण्यात आला आहे. तसेच अध्यापकांच्या शोधनिबंधाच्या गुणांकनाबाबतचा तपशील परिशिष्ट-२ मध्ये देण्यात आला आहे.

**त्याचप्रमाणे सहायक प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक व प्राध्यापक यासंवर्गातील अध्यापकांना करीअर ॲडव्हान्स स्किम लागू करताना शैक्षणिक व रुग्णसेवेबाबत कर्तव्य पार पाडताना त्यांनी व्यावसायिक आचारसंहितेचे (Code of Professional Ethics) पालन करणे बंधनकारक आहे. सदर व्यावसायिक आचारसंहितेचा तपशील सोबतच्या परिशिष्ट क्र. ३ मध्ये देण्यात आला आहे.**

**अ) सहायक प्राध्यापक (वेतनस्तर-१०/रु.५७,७००/-) वरून सहायक प्राध्यापक (वेतनस्तर-११/रु.६८,९००/-) लागू करणे:-**

सहायक प्राध्यापक संवर्गात प्रथम नियुक्तीवेळी ७ व्या वेतन आयोगानुसार लेवल-१० मधील वेतनश्रेणी (रू.५७,७००/-) लागू आहे.

**अर्हता-**

१) भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग, भारतीय दंत परिषद तसेच आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित केलेली तसेच यु.जी.सी. आणि महाराष्ट्र शासनाच्या सेवाप्रवेश नियमानुसार निहित केल्याप्रमाणे शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या वैद्यकीय अर्हताधारक अचिकित्सालयीन, चिकित्सालयीन व अतिविशेषीकृत विषयातील सहायक प्राध्यापकाची लेवल-१० मधील वेतनश्रेणी ४ वर्ष सेवा पूर्ण करणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे अचिकित्सालयीन विषयातील अवैद्यकीय अर्हताधारक सहायक प्राध्यापकांची लेवल-१० वेतनश्रेणीत ६ वर्ष सेवा पूर्ण करणे आवश्यक राहील.

२) (i) अध्यापन पध्दतीबाबत २१ दिवसाचा अभिमुखता अभ्यासक्रम (Orientation Course) पूर्ण केलेला असावा आणि

(ii) संशोधन कार्यपध्दती / रिफ्रेशर अभ्यासक्रम यापैकी एक पूर्ण केलेला असावा

**किंवा**

कार्यशाळा / अभ्यासक्रम सुधारणाबाबत कार्यशाळा / अध्यापन - अध्ययन - मुल्यमापन प्रशिक्षण / तांत्रिक कार्यक्रम आणि विद्याशाखा विकास कार्यक्रम (किमान १ आठवडा कालावधी) यापैकी २ कार्यक्रम पूर्ण केलेले असावे.

**किंवा**

एक MOOCS अभ्यासक्रम (ई-सर्टीफिकेशनसह) किंवा चार चतुर्थांशमध्ये ई-सामग्रीचा विकास (डेव्हलपमेंट ऑफ ई-कन्टेंट्स इन फोर कॉड्रन्ट) / मुल्याकंन कालावधीत MOOCS अभ्यासक्रम पूर्ण केलेला असावा.

३) संबंधित सहायक प्राध्यापकांनी सोबत जोडलेल्या परिशिष्ठ-१ मधील तक्ता-१ मध्ये नमुद केलेल्या निकषांप्रमाणे समाधानकारक (Satisfactory) व चांगला (Good) श्रेणी प्राप्त करणे आवश्यक राहील.

४) संबंधित सहायक प्राध्यापकांचे गोपनीय अहवाल पदोन्नतीसाठी निहित केलेल्या निकषानुसार असावेत.

५) सहायक प्राध्यापकाची अर्हता व निकष याबाबत पदोन्नतीसाठी गठीत केलेल्या छाननी व मुल्यमापन समितीची शिफारस आवश्यक राहील.

६) असे सहायक प्राध्यापक भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग तसेच भारतीय दंत परिषद आणि आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित निकषानुसार देय असलेल्या पदव्युत्तर पदवी विद्यार्थ्यांचे मार्गदर्शक असणे अनिवार्य राहील.

***(वरीलप्रमाणे करिअर एडव्हान्समेंट स्किम देय करताना यापूर्वी शासन सेवेत कोणत्याही पदावर हा लाभ घेतला असल्यास सदर लाभ नव्याने देय ठरणार नाही.)***

**ब) सहायक प्राध्यापक (वेतनस्तर ११/रु.६८,९००/-) वरून सहायक प्राध्यापक (वेतनस्तर १२/रु.७९,८००/-) लागू करणे:-**

**अर्हता-**

१) भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग, भारतीय दंत परिषद तसेच आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित केलेली तसेच यु.जी.सी. आणि महाराष्ट्र शासनाच्या सेवाप्रवेश नियमानुसार निहित केल्याप्रमाणे शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या सहायक प्राध्यापकाची लेवल-११ मधील वेतनश्रेणी ५ वर्ष सेवा पूर्ण करणे आवश्यक राहील.

२) वेतनस्तर-११ मधील ५ वर्षाच्या कालावधीत खालीलपैकी दोन अभ्यासक्रम / कार्यक्रम पूर्ण करणे आवश्यक आहे.

रिफ्रेशर कोर्स/संशोधन कार्यपध्दती अभ्यासक्रम/कार्यशाळा/अभ्यासक्रम श्रेणीवर्धन कार्यशाळा/अध्यापन-अध्ययन-मुल्यमापन/तांत्रिक कार्यक्रम/विद्याशाखा विकास कार्यक्रम बाबत दोन आठवडयाच्या कालावधीचे कार्यक्रम पूर्णपणे आवश्यक आहे किंवा दोन आठवडयाच्या कालावधीचे प्रत्येक अभ्यासक्रम/ कार्यक्रम पूर्ण केलेले असावा किंवा संबंधित विषयातील ई-सर्टीफिकेशनसह संबंधित विषयातील MOOCS अभ्यासक्रम किंवा चार चतुर्थांशमध्ये ई-सामग्रीचा विकास (डेव्हलपमेंट ऑफ ई-कन्टेंट्स इन फोर कॉड्रन्ट) मध्ये सहभाग किंवा MOOCS कोर्सच्या किमान १० मॉडयुल्सच्या विकासासाठी मुल्यांकनाच्या कालावधीत योगदान असावे.

३) संबंधित सहायक प्राध्यापकांनी सोबत जोडलेल्या परिशिष्ठ-१ मधील तक्ता-१ मध्ये नमुद केलेल्या निकषांप्रमाणे समाधानकारक (Satisfactory) व चांगला (Good) श्रेणी प्राप्त करणे आवश्यक राहील.

४) संबंधित सहायक प्राध्यापकांचे गोपनीय अहवाल पदोन्नतीसाठी निहित केलेल्या निकषानुसार असावेत.

५) सहायक प्राध्यापकाची अर्हता व निकष याबाबत पदोन्नतीसाठी गठीत केलेल्या छाननी व मुल्यमापन समितीची शिफारस आवश्यक राहील.

६) असे सहायक प्राध्यापक भारतीय आयुर्विज्ञान परिषदराष्ट्रीय वैद्यक आयोग तसेच भारतीय दंत परिषद / आणि आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित निकषानुसार देय असलेल्या पदव्युत्तर पदवी विद्यार्थ्यांचे मार्गदर्शक असणे अनिवार्य राहील .

*(वरीलप्रमाणे करिअर एडव्हान्समेंट स्किम देय करताना यापूर्वी शासन सेवेत कोणत्याही पदावर हा लाभ घेतला असल्यास सदर लाभ नव्याने देय ठरणार नाही.)*

**क) सहायक प्राध्यापक (वेतनस्तर-१२/रु.७९,८००/-) वरून सहयोगी प्राध्यापक (वेतनस्तर १३A/रु.१,३१,४००/-) लागू करणे:-**

सहयोगी प्राध्यापक संवर्गात प्रथम नियुक्तीवेळी ७ व्या वेतन आयोगानुसार लेवल-१३A मधील वेतनश्रेणी (रू.१,३१,४००/-) लागू आहे.

**अर्हता -**

१) भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग, भारतीय दंत परिषद तसेच आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित केलेली तसेच यु.जी.सी. आणि महाराष्ट्र शासनाच्या सेवाप्रवेश नियमानुसार निहित केल्याप्रमाणे शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या सहायक प्राध्यापकाची लेवल-१२ मधील वेतनश्रेणी ३ वर्ष सेवा पूर्ण करणे आवश्यक राहील.

२) लेवल-१२ मधील ३ वर्षाच्या कालावधीत खालीलपैकी एक अभ्यासक्रम किंवा कार्यक्रम पूर्ण केलेला असावा.

रिफ्रेशर कोर्स/संशोधन कार्यपध्दती अभ्यासक्रम/कार्यशाळा/अभ्यासक्रम श्रेणीवर्धन कार्यशाळा/अध्यापन-अध्ययन-मुल्यमापन/तांत्रिक कार्यक्रम/विद्याशाखा विकास कार्यक्रम बाबत दोन आठवडयाच्या कालावधीचे कार्यक्रम पूर्णपणे आवश्यक आहे किंवा दोन आठवडयाच्या कालावधीचे प्रत्येक अभ्यासक्रम/कार्यक्रम पूर्ण केलेले असावा किंवा संबंधित विषयातील ई-सर्टीफिकेशनसह संबंधित विषयातील MOOCS अभ्यासक्रम किंवा चार चतुर्थांशमध्ये ई-सामग्रीचा विकास (डेव्हलपमेंट ऑफ ई-कन्टेंट्स इन फोर कॉड्रन्ट) मध्ये सहभाग किंवा MOOCS कोर्सच्या किमान १० मॉडयुल्सच्या विकासासाठी मुल्यांकनाच्या कालावधीत योगदान असावे.

३) संबंधित सहायक प्राध्यापकांनी सोबत जोडलेल्या परिशिष्ठ-१ मधील तक्ता-१ मध्ये नमुद केलेल्या निकषांप्रमाणे चांगला (Good) व उत्कृष्ठ (Very Good) श्रेणी प्राप्त करणे आवश्यक राहील.

४) संबंधित सहायक प्राध्यापकांचे गोपनीय अहवाल पदोन्नतीसाठी निहित केलेल्या निकषानुसार असावेत.

५) सहयोगी प्राध्यापकाची अर्हता व निकष याबाबत पदोन्नतीसाठी गठीत केलेल्या छाननी व मुल्यमापन समितीची शिफारस आवश्यक राहील.

६) असे सहायक प्राध्यापक भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग तसेच भारतीय दंत परिषद आणि आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित निकषानुसार देय असलेल्या पदव्युत्तर पदवी विद्यार्थ्यांचे मार्गदर्शक असणे अनिवार्य राहील.

७) मात्र संबंधित सहायक प्राध्यापकांनी लेवल-१३ ए मधील सहयोगी प्राध्यापक पदावरील नियमित पदोन्नती नाकारल्यास त्याला लेवल-१२ मधील वेतनश्रेणीत पदावनत करण्यात येईल.

***(वरीलप्रमाणे करिअर एडव्हान्समेंट स्किम देय करताना यापूर्वी शासन सेवेत कोणत्याही पदावर हा लाभ घेतला असल्यास सदर लाभ नव्याने देय ठरणार नाही.)***

**ड) सहयोगी प्राध्यापक (वेतनस्तर १३ A/रु.१,३१,४००/-) वरून प्राध्यापक (वेतनस्तर १४/रु.१,४४,२००/-) लागू करणे:-**

प्राध्यापक संवर्गात प्रथम नियुक्तीवेळी ७ व्या वेतन आयोगानुसार लेवल-१४ मधील वेतनश्रेणी (रू.१,४४,२००/-) लागू आहे.

**अर्हता -**

१) भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग, भारतीय दंत परिषद तसेच आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित केलेली तसेच यु.जी.सी. आणि महाराष्ट्र शासनाच्या सेवाप्रवेश नियमानुसार निहित केल्याप्रमाणे शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या सहायक प्राध्यापकाची लेवल-१३A मधील वेतनश्रेणी ५ वर्ष सेवा पूर्ण करणे आवश्यक राहील.

२) भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग, भारतीय दंत परिषद तसेच आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित केलेली नियतकालिके (जर्नल्स) तसेच विद्यापीठ अनुदान आयोगद्वारा निहित नियतकालीके (जर्नल्स) मध्ये किमान १० शोधनिबंघ प्रकाशित करणे आवश्यक आहे. त्यापैकी विचाराधीन कालावधीत किमान ३ शोधनिबंध असावेत.

३) परिशिष्ट क्र. २ मधील तक्ता क्र. २ मध्ये नमूद केल्याप्रमाणे किमान ११० संशोधन गुणात्मक असणे आवश्यक आहे.

४) संबंधित सहयोगी प्राध्यापकांनी सोबत जोडलेल्या परिशिष्ठ-१ मध्ये नमुद केलेल्या निकषांप्रमाणे चांगला (Good) व उत्कृष्ठ (Very Good) श्रेणी प्राप्त करणे आवश्यक राहील.

५) संबंधित सहयोगी प्राध्यापकांचे गोपनीय अहवाल पदोन्नतीसाठी निहित केलेल्या निकषानुसार असावेत.

६) प्राध्यापकाची अर्हता व निकष याबाबत पदोन्नतीसाठी गठीत केलेल्या छाननी व मुल्यमापन समितीची शिफारस आवश्यक राहील.

७) असे सहयोगी प्राध्यापक भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग तसेच भारतीय दंत परिषद आणि आयुर्वेद विषयासंदर्भात भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित निकषानुसार देय असलेल्या पदव्युत्तर पदवी विद्यार्थ्यांचे मार्गदर्शक असणे अनिवार्य राहील.

८) संबंधित सहयोगी प्राध्यापकांनी लेवल-१४ मधील प्राध्यापक पदावरील नियमित पदोन्नती नाकारल्यास त्याला लेवल-१३ A मधील वेतनश्रेणीत पदावनत करण्यात येईल.

***(वरीलप्रमाणे करिअर एडव्हान्समेंट स्किम देय करताना यापूर्वी शासन सेवेत कोणत्याही पदावर हा लाभ घेतला असल्यास सदर लाभ नव्याने देय ठरणार नाही.)***

वरीलप्रमाणे करिअर ॲडव्हान्समेंट स्किम लागू करताना छाननी व मुल्यमापन करण्यासाठी खालीलप्रमाणे राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई | | अध्यक्ष |
| २ | संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई (वैद्यकीय व दंत मधील अध्यापकांसाठी) | | सदस्य |
| ३ | संचालक, आयुष संचालनालय, मुंबई (आयुष मधील अध्यापकांसाठी) | | सदस्य |
| ४ | सह सचिव/उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग | | सदस्य |
| ५ | सह संचालक, (वैद्यकीय) वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई | | सदस्य |
| ६ | शासकीय वैद्यकीय/दंत/आयुष महाविद्यालयातील सेवाज्येष्ठ अधिष्ठाता | | सदस्य |
| ७ | शासकीय वैद्यकीय/दंत/आयुष महाविद्यालयातील संबंधित विषयातील सेवाज्येष्ठ प्राध्यापक | | सदस्य |
| ८ | शासकीय वैद्यकीय/दंत/आयुष महाविद्यालयातील संबंधित विषयातील दोन तज्ञ प्राध्यापक | | सदस्य |
| ९ | मुख्य प्रशासकीय अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई/ आयुष संचालनालय, मुंबई | | सदस्य सचिव |

२.७ उपरोक्त भत्त्याव्यतिरिक्त अन्य भत्ते हे राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना देय असलेल्या दरानुसार अनुज्ञेय राहतील.

२.८ राज्यातील वैद्यकीय सेवा ग्रामीण भागापर्यंत नेण्यासाठी शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील शिक्षण आणि रुग्णसेवा यासंदर्भात राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय मानके विचारात घेवून, अध्यापकांनी संशोधनात्मक कामकाज करणे व त्यासाठी त्यांना अनुषंगीक प्रोत्साहन देणे, त्यासाठी प्रशिक्षीत व अर्हताधारक मनुष्यबळ उपलब्ध करणे, महाविद्यालयांशी संलग्नित रुग्णालयातील रुग्णसेवेमध्ये कोणत्या दर्जेदार सुविधा निर्माण करता येतील याचा अभ्यास करुन रुग्णसेवेसंदर्भात पॅरामेडीकल क्षेत्रात प्रशिक्षित मनुष्यबळ तयार करणे, राज्यात नियमित संसर्गजन्य आजार तसेच कोवीड-१९ सारख्या संसर्गजन्य आपत्कालीन महामारीचा सामना करणेसाठी तसेच कर्करोग, ह्रदयरोग, किडनी विकार, न्युरोलॉजी यासारख्या अतिगंभीर आजारांवर उपचारासाठी प्रशासकीय व रुग्णसेवच्या अनुषंगाने भविष्यात कोणत्या उपाययोजना करता येतील आणि सन-२०३५ पर्यंत राज्यात निर्माण होणाऱ्या वैद्यकीय सोयीसुविधा विचारात घेवून, प्रशिक्षीत व अर्हताधारक मनुष्यबळ उपलब्ध करण्यासाठी विविध उपाययोजना करणे व त्यांना संशोधन भत्ता, जोखीम भत्ता तसेच अन्य कोणते अनुषंगीक भत्ते लागू करता येतील याबाबत अभ्यास करणे आवश्यक आहे. सबब, शासकीय वैद्यकीय / दंत / आयुर्वेद महाविद्यालये शैक्षणिक व संशोधनात्मक कामाच्या अनुषंगाने भारतीय आयुर्विज्ञान परिषद / राष्ट्रीय वैद्यक आयोग / विद्यापीठ अनुदान आयोग तसेच महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांनी वेळोवेळी निहित केलेले निकष व मानकांनुसार विचारात घेवून, अध्यापकांनी शैक्षणिक / संशोधनात्मक तसेच रुग्णसेवेच्या संदर्भात आवश्यक निकषांची पूर्तता करणें याबाबत सर्वंकष अभ्यास करून शासनास शिफारस करण्यासाठी परि. ३ मध्ये प्रस्तावित केल्याप्रमाणे अपर मुख्य सचिव या दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव (कार्यरत अथवा सेवानिवृत्त), मंत्रालय, मुंबई | | अध्यक्ष |
| २ | अमुस/प्रस/सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | | सदस्य |
| ३ | अमुस/प्रस/सचिव, (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई | | सदस्य |
| ४ | आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व आयुष संचालनालय, मुंबई | | सदस्य |
| ५ | कुलगुरु, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विज्ञापीठ, नाशिक | | सदस्य |
| ६ | संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई | | सदस्य सचिव |

३. राज्यातील शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील अध्यापक, तसेच अधिष्ठाता, सह संचालक व संचालक या संवर्गांना उपरोक्त परिच्छेद २.१ ते २.५ मध्ये नमुद केलेले विविध भत्ते सुधारित दराने लागू करताना रुपये १०३,९५,९७,०००/- (रु.एकशे तीन कोटी, पंच्यान्नव लाख, सत्यान्नव हजार फक्त) इतका वार्षिक आवर्ती खर्च करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचा खर्च संबंधित संस्थांनी सदर प्रयोजनार्थ त्यांना मंजूर असलेल्या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

४. उपरोक्त परिच्छेद क्र. २.१ ते २.५ मध्ये नमूद केलेले विविध भत्ते हे शासन आदेश निर्गमित केल्याच्या दिनांकापासून देय राहतील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३/२०२२/सेवा-५, दिनांक १४.०३.२०२२ अन्वये दिलेल्या अभिप्रायानुसार तसेच मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक ३१.०३.२०२२ च्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४१२११३३०८५०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRINIVAS PUNDLIKRAO KOTWAL

Digitally signed by SHRINIVAS PUNDLIKRAO KOTWAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=d32b061d22e577cf43207f6a86cadc4ce1798644845edd3b3fb5ef54c3051c62, pseudonym=FBB5CB78D48FD59FDB880E6E036B604B5888852F, serialNumber=30EC04F686F0E87515C68A42BC5DF9353C8AF939EF1A35539184495DA3E943C6,
cn=SHRINIVAS PUNDLIKRAO KOTWAL
Date: 2022.04.12 03:09:34 -07'00'

**डॉ.श्रीनिवास पुं. कोतवाल**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१०) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
११) अधिष्ठाता, सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालये,
१२) सर्व सह सचिव / उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुबई
१३) महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
१४) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
१५) निवडनस्ती (वैसेवा-२).

**शासन निर्णय क्र.वेतन-२०२१/प्र.क्र.६२/२०२१/वैसेवा-२, दिनांक १२ एप्रिल, २०२२ सोबतचे**

**परिशिष्ठ-१**

शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालयातील सहायक प्राध्यापक व सहयोगी प्राध्यापक यांना करिअर एडव्हॉन्समेंट स्किम (आश्वासित प्रगती योजना) लागू करण्यासंदर्भात आवश्यक निकष :-

| अ.क्र. | उपक्रम (Activity) | मूल्यांकन निकष (Grading Criteria) |
|---|---|---|
| १ | अध्यापन (Teaching)<br>(शिकवलेल्या तासिकांची संख्या ÷ एकूण निहित केलेल्या तासिकांची संख्या) X १०० | ९०% पेक्षा जास्त- उत्कृष्ट (Very Good)<br>८०% ते ९०% पेक्षा कमी - चांगला (Good)<br>७०% ते ८०% - समाधानकारक (Satisfactory)<br>७०% पेक्षा कमी - असमाधानकारक (Not-Satisfactory)<br>(संबंधित विषयाच्या पदव्युत्तर अथवा पदवी अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांकडून अध्यापकांच्या शैक्षणिक कामकाजासंदर्भात मुल्यांकन करण्याच्यादृष्टीने अभिमत (Feedback), अध्यापन कौशल्य, वक्तशीरपणा, सचोटी इ.निकषाच्या आधारे निश्चित करण्यात आलेल्या १० गुणांच्या प्रश्नावलीवर गुणांकनासंदर्भात किमान ७ गुणांकन प्राप्त करणे आवश्यक राहील.) |
| २ | रुग्णसेवा (Clinical Services) (लागू असलेल्या विषयांसाठी)<br>(घेतलेल्या ओ.पी.डी. ची संख्या ÷ एकूण निहित केलेल्या ओ.पी.डी. ची संख्या) X १०० | ९०% पेक्षा जास्त- उत्कृष्ट (Very Good)<br>८०% ते ९०% पेक्षा कमी - चांगला (Good)<br>७०% ते ८०% - समाधानकारक (Satisfactory)<br>७०% पेक्षा कमी - असमाधानकारक (Not-Satisfactory)<br>(रुग्णसेवेसंदर्भात अभिमत (Feedback) घेण्यासाठी काही प्रसंगी रुग्णांकडून स्वतंत्र प्रश्नावलीच्या आधारे निश्चित करण्यात आलेल्या १० गुणांच्या प्रश्नावलीवर गुणांकनासंदर्भात किमान ७ गुणांकन प्राप्त करणे आवश्यक राहील.) |
| ३ | चिकित्सालयीन विषयातील अध्यापकांनी पार पाडलेल्या शस्त्रक्रिया व त्यासोबत विद्यार्थ्यांना देण्यात आलेले प्रात्यक्षिक मार्गदर्शन<br>(प्रत्यक्ष पार पाडलेल्या शस्त्रक्रियांची संख्या ÷ संबंधित विषयाच्या विभागातील पार | ५०% पेक्षा जास्त- उत्कृष्ट (Very Good)<br>४०% ते ५०% पेक्षा कमी - चांगला (Good)<br>३०% ते ४०% - समाधानकारक (Satisfactory)<br>३०% पेक्षा कमी - असमाधानकारक (Not-Satisfactory) |

| | | |
|---|---|---|
| | पाडलेल्या एकूण शस्त्रक्रियांची संख्या X १०० | |
| ४ | विद्यापीठ/महाविद्यालय विद्यार्थ्यांशी निगडीत तसेच वैद्यकीय संशोधनात्मक कामकाजाशी संबंधित उपक्रम | किमान ५ उपक्रमांमध्ये सहभाग- उत्कृष्ट (Very Good)<br>४ उपक्रमांमध्ये सहभाग - चांगला (Good)<br>३ उपक्रमांमध्ये सहभाग- समाधानकारक (Satisfactory)<br>३ पेक्षा कमी उपक्रमांमध्ये सहभाग - असमाधानकारक (Not-Satisfactory) |
| | अ) विद्यापीठ व महाविद्यालयाने विद्यार्थ्यांची परिक्षा व मुल्यमापन संदर्भात सोपविण्यात आलेल्या उपक्रमात सहभागी होणे. | |
| | ब) पदवी व पदव्युत्तर विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक उपक्रमांसंदर्भात विद्यापीठ व महाविद्यालयाने आयोजित केलेल्या विविध परिसंवाद,परिषदा,कार्यशाळा इत्यादी उपक्रमात सहभागी होणे | |
| | क) पदवी व पदव्युत्तर विद्यार्थी प्रवेश प्रक्रियेत विद्यापीठ व महाविद्यालयाने सोपविलेली कर्तव्य व जबाबादारी पार पाडणे. | |
| | ड) विद्यापीठाद्वारे संबंधित महाविद्यालया करिता निहित केलेल्या स्थानिक परिक्षण समिती (Local Inspection Committee) मध्ये जबाबदारी पार पाडणे | |
| | इ) पदव्युत्तर विद्यार्थ्यांच्या मार्गदर्शन प्रक्रियेत सक्रिय सहभाग घेणे | |
| | ई) वैद्यकीय संशोधनात्मक कामाच्या संदर्भात दरवर्षी किमान ०१ शोधनिबंध सादर करणे तसेच असे शोधनिबंध भारतीय आयुर्विज्ञान परिषद/राष्ट्रीय वैद्यक आयोग, भारतीय दंत परिषद तसेच भारतीय चिकित्सा केंद्रीय परिषद यांनी निहित केलेल्या नियतकालिकेत प्रसिध्द करणे | |

**टिप:-** उपरोक्त नमुद केलेल्या उपक्रमांमधील सहभागांचे मुल्यांकन करतांना संबंधित अध्यापकांनी मंजूर करून घेतलेली अर्जित रजा, प्रसुती रजा, बालसंगोपन रजा, अध्ययन रजा, वैद्यकीय रजा, असाधारण रजा व प्रतिनियुक्तीवरील कालावधी या प्रयोजनार्थ गैरहजर कालावधी मुल्यमापन प्रक्रियेसाठी वगळण्यात यावा. अध्यापकांचे मुल्यमापन उर्वरित कालावधीच्या अनुषंगाने करण्यात येऊन त्याप्रमाणे श्रेणी निहित करण्यात यावी. सक्षम प्राधिका-याच्या पुर्वमंजुरीने उपरोक्त प्रयोजनार्थ रजेवर असलेल्या कालावधीमुळे संबंधित अध्यापकाच्या आश्वासित प्रगती योजनेच्या लाभावर कोणताही प्रतिकुल परिणाम होणार नाही.

शासन निर्णय क्र.वेतन-२०२१/प्र.क्र.६२/२०२१/वैसेवा-२, दिनांक १२ एप्रिल, २०२२ सोबतचे
परिशिष्ठ-२
टेबल-१

| S. N. | Academic/Research Activity | Faculty of Medical Education |
|---|---|---|
| 1 | **Research Papers in Peer-Reviewed or UGC listed Journals** | 08 per paper |
| 2 | **Publications (other than Research papers)** | |
| | **(a) Books authored which are published by:** | |
| | International publishers | 12 |
| | National Publishers | 10 |
| | Chapter in Edited Book | 05 |
| | Editor of Book by International Publisher | 10 |
| | Editor of Book by National Publisher | **08** |
| | **(b) Translation works in Indian and Foreign Languages by qualified faculties** | |
| | Chapter or Research paper | 03 |
| | Book | 08 |
| 3 | **Creation of ICT mediated Teaching Learning pedagogy and content and development of new and innovative courses and curricula** | |
| | **(a) Development of Innovative pedagogy** | 05 |
| | **(b) Design of new curricula and courses** | 02 per curricula/course |
| | **(c) MOOCs** | |
| | Development of complete MOOCs in 4 quadrants (4 credit course) (In case of MOOCs of lesser credits 05 marks/credit) | 20 |
| | MOOCs (developed in 4 quadrant) per module/lecture | 05 |
| | Content writer/subject matter expert for each module of MOOCs (at least one quadrant) | 02 |
| | Course Coordinator for MOOCs (4 credit course) (In case of MOOCs of lesser credits 02 Marks/credit) | 08 |
| | **(d) E-Content** | |
| | Development of e-Content in 4 quadrants for a complete course/e-book | 12 |

| | | |
|---|---|---|
| | e-Content (developed in 4 quadrants) per module | 05 |
| | Contribution to development of e-content module in complete course/paper/e-book (at least one quadrant) | 02 |
| | Editor of e-content for complete course/ paper /e-book | 10 |
| **4** | **(a) Research guidance** | |
| | Ph.D. | 10 per degree awarded<br>05 per thesis submitted |
| | M.Phil./P.G dissertation | 02 per degree awarded |
| | **(b) Research Projects Completed** | |
| | More than 10 lakhs | 10 |
| | Less than 10 lakhs | **05** |
| | **(c) Research Projects Ongoing :** | |
| | More than 10 lakhs | 05 |
| | Less than 10 lakhs | 02 |
| | **(d) Consultancy** | **03** |
| **5** | **(a) Patents** | |
| | International | 10 |
| | National | 07 |
| | **(b) *Policy Document (Submitted to an International body/organisation like UNO/UNESCO/World Bank/International Monetary Fund etc. or Central Government or State Government)** | |
| | International | 10 |
| | National | 07 |
| | State | 04 |
| | (c) **Awards/Fellowship** | |
| | International | 07 |
| | National | 05 |
| | ***Invited lectures / Resource Person/ paper presentation in Seminars/ Conferences/full paper in Conference Proceedings (Paper presented in Seminars/Conferences and also published as full paper in Conference Proceedings will be counted only once)** | |

| | | |
|---|---|---|
| | International (Abroad) | 07 |
| | International (within country) | 05 |
| | National | 03 |
| | State/University | 02 |

**The Research score for research papers would be augmented as follows:**

Peer-Reviewed or UGC-listed Journals (Impact factor to be determined as per Thomson Reuters list):

i) Paper in refereed journals without impact factor - 5 Points

ii) Paper with impact factor less than 1 - 10 Points

iii) Paper with impact factor between 1 and 2 - 15 Points

iv) Paper with impact factor between 2 and 5 - 20 Points

v) Paper with impact factor between 5 and 10 - 25 Points

vi) Paper with impact factor >10 - 30 Points

a) Two authors: 70% of total value of publication for each author.

b) More than two authors: 70% of total value of publication for the First/Principal/Corresponding author and 30% of total value of publication for each of the joint authors. Joint Projects: Principal Investigator and Co-investigator would get 50% each.

**Note:**

- Paper presented if part of edited book or proceeding then it can be claimed only once.
- For joint supervision of research students, the formula shall be 70% of the total score for Supervisor and Co-supervisor. Supervisor and Co-supervisor, both shall get 7 marks each.
- *For the purpose of calculating research score of the teacher, the combined research score from the categories of 5(b). Policy Document and 6. Invited lectures/Resource Person/Paper presentation shall have an upper capping of thirty percent of the total research score of the teacher concerned.
- The research score shall be from the minimum of three categories out of six categories.

शासन निर्णय क्र.वेतन-२०२१/प्र.क्र.६२/२०२१/वैसेवा-२, दिनांक १२ एप्रिल, २०२२ सोबतचे

परिशिष्ठ-२

टेबल-२

**(Minimum API requirement for the promotion of teachers under CAS in colleges UG & PG)**

| **S. No.** | | **Assistant Professor (Stage1/ AGP Rs. 6000 to Stage 2/ AGP Rs. 7000)** | **Assistant Professor (Stage2/ AGP Rs. 7000 to Stage 3/ AGP Rs. 8000)** | **Assistant Professor (Stage3/ AGP Rs. 8000) to Associate Professor (Stage 4/AGP Rs.9000)** | **Associate Professor (Stage4/ AGP Rs. 9000) to Professor (Stage 5/AGP Rs.10000)** |
|---|---|---|---|---|---|
| **1** | Research and Academic Contribution (Category III) | 20/ assessment period | 50/ assessment period | 45/ assessment period | 60/ assessment period |
| **2** | Expert assessment System | Screening Committee | Screening Committee | Selection Committee | Selection Committee |

शासन निर्णय क्र.वेतन-२०२१/प्र.क्र.६२/२०२१/वैसेवा-२, दिनांक १२ एप्रिल, २०२२ सोबतचे

परिशिष्ठ-३

**Code of Professional Ethics**

**I. Teachers and their Responsibilities:**

Whoever adopts teaching as a profession assumes the obligation to conduct himself / herself in accordance with the ideal of the profession. A teacher is constantly under the scrutiny of his students and the society at large. Therefore, every teacher should see that there is no incompatibility between his precepts and practice. The national ideals of education which have already been set forth and which he/she should seek to inculcate among students must be his/her own ideals. The profession further requires that the teacher should be calm, patient and communicative by temperament and amiable in disposition.

**Teacher should:**

i. Adhere to a responsible pattern of conduct and demeanor expected of them by the community;

ii. Manage their private affairs in a manner consistent with the dignity of the profession;

iii. Seek to make professional growth continuous through study and research;

iv. Express free and frank opinion by participation at professional meetings, seminars, conferences etc., towards the contribution of knowledge;

v. Maintain active membership of professional organizations and strive to improve education and profession through them;

vi. Perform their duties in the form of teaching, tutorials, practicals, seminars and research work, conscientiously and with dedication;

vii. Discourage and not indulge in plagiarism and other non ethical behaviour in teaching and research;

viii. Abide by the Act, Statute and Ordinance of the University and to respect its ideals, vision, mission, cultural practices and tradition;

ix. Co-operate and assist in carrying out the functions relating to the educational responsibilities of the college and the university, such as: assisting in appraising applications for admission, advising and counselling students as well as assisting the conduct of university and college examinations, including supervision, invigilation and evaluation; and

x. Participate in extension, co-curricular and extra-curricular activities, including the

community service.

**II. Teachers and Students**

**Teachers should:**

i. Respect the rights and dignity of the student in expressing his/her opinion;

ii. Deal justly and impartially with students regardless of their religion, cast gender, political, economic, social and physical characteristics;

iii. Recognise the difference in aptitude and capabilities among students and strive to meet their individual needs;

iv. Encourage students to improve their attainments, develop their personalities and at the same time contribute to community welfare;

v. Inculcate among students scientific temper, spirit of inquiry and ideals of democracy, patriotism, social justice, environmental protection and peace;

vi. Treat the students with dignity and not behave in a vindictive manner towards any of them for any reason;

vii. Pay attention to only the attainment of the student in the assessment of merit;

viii. Make themselves available to the students even beyond their class hours and help and guide students without any remuneration or reward;

ix. Aid students to develop an understanding of our national heritage and national goals; and

x. Refrain from inciting students against other students, colleagues or administration.

**III. Teachers and Colleagues**

**Teachers should:**

i. Treat other members of the profession in the same manner as they themselves wish to be treated;

ii. Speak respectfully of other teachers and render assistance for professional betterment;

iii. Refrain from making unsubstantiated allegations against colleagues to higher authorities; and

iv. Refrain from allowing considerations of caste, creed, religion, race or sex in their professional endeavour.

**IV. Teachers and Authorities**

**Teachers should:**

i. Discharge their professional responsibilities according to the existing Rules and adhere to procedures and methods consistent with their profession in initiating steps through their own

institutional bodies and / or professional organizations for change of any such Rule detrimental to the professional interest;

ii. Refrain from undertaking any other employment and commitment, including private tuitions and coaching classes which are likely to interfere with their professional responsibilities;

iii. Co-operate in the formulation of policies of the institution by accepting various offices and discharge responsibilities which such offices may demand;

iv. Co-operate through their organizations in the formulation of policies of the other institutions and accept offices;

v. Co-operate with the authorities for the betterment of the institutions keeping in view the interest and in conformity with the dignity of the profession;

vi. Adhere to the terms of contract;

vii. Give and expect due notice before a change of position takes place; and

viii. Refrain from availing themselves of leave except on unavoidable grounds and as far as practicable with prior intimation, keeping in view their particular responsibility for completion of academic schedule.

**V. Teachers and Non-Teaching Staff**

**Teachers should :**

i. Treat the non-teaching staff as colleagues and equal partners in a cooperative undertaking, within every educational institution;

ii. Help in the functioning of joint-staff councils covering both the teachers and the nonteaching staff.

**VI. Teachers and Guardians**

**Teachers should:**

Try to see through teachers' bodies and organizations, that institutions maintain contact with the guardians, their students, send reports of their performance to the guardians whenever necessary and meet the guardians in meetings convened for the purpose for mutual exchange of ideas and for the benefit of the institution.

**VII. Teachers and Society**

**Teachers should:**

i. Recognize that education is a public service and strive to keep the public informed of the educational programmes which are being provided;

ii. Work to improve education in the community and strengthen the community's moral and intellectual life ;

iii. Be aware of social problems and take part in such activities as would be conducive to the progress of society and hence the country as a whole;

iv. Perform the duties of citizenship, participate in community activities and shoulder responsibilities of public offices;

v. Refrain from taking part in or subscribing to or assisting in any way activities, which tend to promote feeling of hatred or enmity among different communities, religions or linguistic groups but actively work for national integration.

**शासन निर्णय क्र.वेतन-२०२१/प्र.क्र.६२/२०२१/वैसेवा-२, दिनांक १२ एप्रिल, २०२२ सोबतचे**

## हमीपत्र

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग शासन निर्णय क्र.वेतन-२०२१/प्र.क्र.६२/२१/वैसेवा-२, दिनांक १२ एप्रिल, २०२२ अन्वये लागू केलेली करिअर ॲडव्हान्समेंट स्किम (CAS) त्यात नमुद केलेल्या अटी व शर्तीसह मला मान्य आहे. तसेच सदर स्किम लागू करतांना शैक्षणिक व रुग्णसेवेबाबत कर्तव्य पार पाडताना सदर शासन निर्णय सोबतच्या परिशिष्ठ-३ मध्ये नमुद केलेल्या व्यावसायिक आचारसंहितेचे (Code of Professional Ethics) पालन करणे बंधनकारक असल्याचे मी या हमीपत्राद्वारे मान्य करित आहे.

अध्यापकाचे नांव:-
पदनाम:-

प्रति,

आयुक्त, (वैद्यकीय शिक्षण) वैद्यकीय शिक्षण व आयुष संचालनालय, मुंबई
संचालक वैद्यकीय शिक्षण / आयुष संचालनालय, मुंबई
अधिष्ठाता - सर्व संस्था (शासकीय वैद्यकीय, दंत व आयुर्वेद महाविद्यालय)